नेटवर्क फॉर स्पेक्ट्रम (एनएफएस) सेल, डायरेक्टोरेट ऑफ सिग्नल्स, मिनिस्ट्री ऑफ डिफेन्स यांच्या भूमिगत ऑप्टीकल फायबर केबल करिता वनजमिन वळती करण्याबाबत.......

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक:एफएलडी-२०१५/प्र.क्र.१२८/फ-१०**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: १०/०४/२०१५

वाचा -

१) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.११-९/९८-एफसी, दिनांक १६/१०/२०००
२) पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ.नंबर.११-५६८/२०१४, एफसी, दिनांक ०२/०२/२०१५
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१७/नोडल सेल/१७-४/२०९५/२०१४-१५, दि.२७/०२/२०१५

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने नेटवर्क फॉर स्पेक्ट्रम (एनएफएस) सेल, डायरेक्टोरेट ऑफ सिग्नल्स, मिनिस्ट्री ऑफ डिफेन्स यांच्या भूमिगत ऑप्टीकल फायबर केबल करिता वनजमिन वळती करण्याबाबत दिनांक ०२/०२/२०१५ च्या पत्रान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यास अनुसरुन प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या दिनांक २७/०२/२०१५ च्या पत्रान्वये वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत सदर प्रकल्पाकरिता वनजमिन वळती करणाची परवानगी देण्यासाठी मुख्य वनसंरक्षक (प्रा ) यांना प्राधिकृत करण्याबाबत विनंती केली आहे.

सदर प्रकल्प राष्ट्रीय हिताचा एक महत्वपूर्ण प्रकल्प असल्याने व सदर प्रकल्पाची अंमलबजावणी योग्य प्रकारे व त्वरेने होण्याकरीता वन विभागाचे आवश्यक ते सहकार्य प्रकल्प यंत्रणेस मिळावे या अनुषंगाने शासन खालील मार्गदर्शक सूचना या परिपत्रकाव्दारे देत आहे:-

**शासन परिपत्रक:-**

१. केंद्र शासनाच्या दि.१६.१०.२००० च्या पत्रान्वये तसेच दिनांक ०२/०२/२०१५ चे प्राप्त मार्गदर्शक सूचनेनूसार जेथे वृक्ष तोडीचा अंतर्भाव नाही व असे वनक्षेत्र राष्ट्रीय उद्यान किंवा अभयारण्याच्या बाहेर आहे, तसेच सदर काम अस्तित्वात असलेल्या रस्त्याच्या राईट ऑफ वे मध्ये करावयाचे आहे आणि त्यासाठी जास्तीत जास्त एक मीटर रुंद व दोन मीटर खोल या आकाराचा

खंदक खोदावा लागेल, अशा वनक्षेत्रातून जाणा-या रस्त्याच्या कडेने भूमिगत ऑप्टीकल फायबर केबल टाकण्याकरीता फक्त नेटवर्क फॉर स्पेक्ट्रम (एनएफएस) सेल, डायरेक्टोरेट ऑफ सिग्नल्स, मिनिस्ट्री ऑफ डिफेन्स च्या ऑप्टीकल फायबर केबलच्या प्रस्तावास वन (संवर्धन) अधिनियम,१९८० च्या कलम (२) प्रमाणे खालील अटींच्या अधीन राहून सर्वसाधारण मान्यता (general approval) प्रदान करण्यात येत आहे व अशी परवानगी देण्याबाबत संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यांना फक्त वनक्षेत्रातून जाणा-या रस्त्याच्या राईट ऑफ वे मध्ये परवानगी देण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

i. प्रकल्प यंत्रणेस प्रपत्र-अ मध्ये अर्ज करण्याची आवश्यकता नाही, मात्र त्यांनी अर्ज करताना रस्त्याचा तपशील, रस्त्याचा नकाशा व अस्तित्वात असलेल्या राईट ऑफ वे ची रुंदी नमूद करणे आवश्यक राहिल.
ii. प्रकल्प यंत्रणा स्थानिक अधिनियम / नियम इ. प्रमाणे स्थानिक वनविभागाची परवानगी घेईल.
iii. प्रकल्प यंत्रणा वन/पर्यावरणाच्या होणा-या नुकसानीची भरपाई करण्यास तयार असेल.
iv. प्रकल्प यंत्रणा वनजमिनीच्या उपयोगानंतर त्याला पूर्ववत करण्यास तयार असेल.
v. प्रकल्प यंत्रणा प्रकल्पाच्या देखभालीकरीता स्थानिक वन विभागाची परवानगी घेईल.
vi. वनक्षेत्राच्या वैधानिक दर्जात बदल होणार नाही व सदर वनक्षेत्र वन विभागाच्या ताब्यात राहील.

२. संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा.) यांनी नेटवर्क फॉर स्पेक्ट्रम (एनएफएस) सेल, डायरेक्टोरेट ऑफ सिग्नल्स, मिनिस्ट्री ऑफ डिफेन्स यांच्या भूमिगत ऑप्टीकल फायबर केबल टाकण्यासाठीचे प्रस्ताव देशाच्या संरक्षणविषयक बाबीसंदर्भात असल्याने त्याची गोपनीयता राखण्यासाठी ऑनलाईन सादर करु नयेत. सदर आदेश राज्य शासनाच्या वेबसाईटवर टाकण्याची आवश्यकता नाही.

३. संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा.) नेटवर्क फॉर स्पेक्ट्रम (एनएफएस) सेल, डायरेक्टोरेट ऑफ सिग्नल्स, मिनिस्ट्री ऑफ डिफेन्स यांच्या भूमिगत ऑप्टीकल फायबर केबल टाकण्यासाठी दिलेल्या परवानगी आदेशाच्या प्रती संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा), अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सादर करतील. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर संपूर्ण राज्यात मुख्य वनसंरक्षक (प्रा) यांच्याद्वारे दिलेल्या आदेशाबाबतचा एकत्रित त्रैमासिक अहवाल राज्य शासनास, केंद्र शासनाच्या पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय तसेच क्षेत्रीय कार्यालयास माहिती व अभिलेखासाठी सादर करतील.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१०१०५१०७३५१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: CN = TIWARI VIRENDRA RAMBAHAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST,CID - 917243
Date: 2015.04.10 11:00:50 +05'30'

**( वीरेन्द्र तिवारी )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
8. Col.Suarabh Tewari, Network for Spectrum (NFS) Cell, Directorate General of Signals, Ministry of Defence, Rao Tula Marg, New Delhi-110010.
9. Shri. AS Khutel, Lt. Col. Jt. Dir. for Chairman PICGए Network for Spectrum (NFS) Cell, Directorate General of Signals, Ministry of Defence, Rao Tula Marg, New Delhi-110010.
१०. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
११.उप वनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व
१२.निवडनस्ती (फ-१०)